2011020420162600 1

<u>नागपूर महानगरपालिकेच्या शहर बस सेवेचे नियोजन, संनियंत्रण, देखभाल व व्यवस्थापनासाठी महानगरपालिकेच्या मालकीची कंपनी स्थापन करण्याबाबत.</u>

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र.नामंपा २००९/प्रक्र १६०/नवि-२६
मंत्रालय, मुंबई ४०००३२,
दिनांक - १ डिसेंबर , २००९

पहा : - आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांचे पत्र क्रमांक एमसी/[illegible]/२००९ दिनांक २६/८/२००९

प्रस्तावना:

नागपूर शहरामध्ये सार्वजनिक परिवहनाचा सहभाग वाढविणे, नागरिकांना चांगली शहर बस सेवा पुरविणे, नागपूर शहराची शहर बस सेवा सुचारू रूपाने चालविणे त्याचे नियोजन, संनियंत्रण, देखभाल व व्यवस्थापनाकरिता नागपूर महानगर पालिकेच्या मालकीची नागपूर महानगर परिवहन मर्यादित ही (nagpur mahanagar privahan ltd.) कंपनी स्थापन करण्यासंबंधी नागपूर महानगरपालिकेने, नागपूर शहर महानगर पालिका अधिनियम १९४८ च्या कलम ५८B च्या तरतुदीच्या अनुषंगाने महानगर पालिका सर्वसाधारण सभा ठराव क्रमांक ४२८ दिनांक २८/७/२००९ अन्वये प्रस्तावित केले असून त्यानुसार प्रस्ताव मान्यतेसाठी शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत सर्वकष विचार करून शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## <u>शासन निर्णय</u> :-

नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम १९४८ च्या कलम ५८B नुसार महापालिका आपले कर्तव्य शासन विहित करेल, या अटी / शर्तावर कोणत्याही यंत्रणे मार्फत बजावू शकते. सदर तरतुदीच्या अनुषंगाने नागपूर शहर बस सेवा सुचारू रुपाने चालविणे, त्यांत नागरिकांकरिता चांगली सोय देणे व व्यवस्थापनाची जबाबदारी पार पाडण्याकरिता पूर्णत: नागपूर महानगरपालिकेच्या मालकीची, नागपूर महानगर परिवहन मर्यादित (nagpur mahanagar privahan ltd.) ही कंपनी स्थापन करण्यास खालीलप्रमाणे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर कंपनीच्या संचालक मंडळावर एकूण अकरा (११)संचालक असतील.

त्यापैकी महापौर हे अध्यक्ष तर महानगरपालिका आयुक्त हे उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकिय संचालक म्हणून राहतील. उर्वरीत नऊ (९) संचालकांपैकी चार (४) संचालक महानगपालिकेच्या पदाधिकारी / नगर सेवकांमधून महानगरपालिकेकडून निवडण्यात यावेत.

उर्वरीत पाच (५) संचालक महानगरपालिकेअंतर्गत कार्यरत संबंधित तांत्रिक / वित्त विभागांच्या खाते प्रमुखांमधून / संबंधित क्षेत्रातील वरीष्ठ शासकीय किंवा निमशासकीय अधिकाऱ्यांमधून महानगरपालिका आयुक्तांकडून नियुक्त करण्यात यावेत. तथापि, शासकीय किंवा निमशासकीय अधिकाऱ्यास सदर कंपनीच्या संचालकपदी नियुक्त करावयाचे असल्यास त्यासाठी शासनाची पूर्वमंजूरी घेणे आवश्यक राहील.

२. सदर कंपनी ही नागपूर शहरातील सार्वजनिक बस सेवेचे नियोजन, संनियंत्रण, विकास,देखभाल, प्रशासन व व्यवस्थापनेची जबाबदारी पारपाडेल.

३. सदर कंपनीच्या निर्णयाचे पूनर्विलोकन करण्याचे अधिकार शासनाने राखून ठेवले आहेत.

या निर्णयानुसार नवीन कंपनीची स्थापना करण्यासाठी आवश्यक ती पुढील कार्यवाही महानगरपालिकेने करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावने.

(का.तु.सातकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१ मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२ मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३ मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४ मा.राज्यमंत्री, नगर विकास,मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
५ प्रधान सचिव, (परिवहन) गृह विभाग,मंत्रालय, मुंबई
६ प्रधान सचिव वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
७ परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य.
८ विभागीय आयुक्त यांच कार्यालय, नागपूर
९ जिल्हाधिकारी, नागपूर
१० आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
११ सह सचिव / उपसचिव, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
१२ निवड नस्ती नवि २६

nagpur privahan ltd g.r.D:\ud26